जल जीवन कार्यक्रमांतर्गत ६ विभागीय आणि २८ जिल्हा प्रयोगशाळांमध्ये पाण्यातील Sodium व Potassium घटक तपासणीसाठी आवश्यक असलेले Microprocessor based Flame Photometer उपकरण खरेदीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूक्यूएम- २०२४/प्र. क्र.५२/पापु-१२
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: २८ जून, २०२४.

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: जजमि-२०१९/प्र.क्र.१३८/पापु-१० (०७), दि.०४ सप्टेंबर, २०२०.

२) अवर सचिव, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र. W-११०२०/१९७/२०१५-WATER-I/१३, दिनांक १८ जुलै, २०२३ व आदेश क्र. W-११०२०/१९७/२०१५-WATER-I/३२, दिनांक ०६ सप्टेंबर, २०२३

३) शासन निर्णय क्रमांकः जजीमि-२०२३/प्र. क्र.३३१/पापु-१०, दिनांक ०१ ऑगस्ट, २०२३ व दिनांक ०१ ऑक्टोबर, २०२३

४) अभियान संचालक (जजीमि),राज्य पाणी व स्वच्छता मिशन,सिडको भवन,बेलापूर यांचे पत्र.क्र. रापास्वमि/पागुशा ०५२३/ प्र. क्र. १४/१९७६/२०२३, दिनांक १३ नोव्हेंबर, २०२३ व दिनांक २३ नोव्हेंबर, २०२३.

५) आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र जा.क्र. भूसवियं/प्रयोग/Flame photometer/प्र.क्र.६१/५२५/२०२३,दिनांक २०नोव्हेंबर, २०२३.

६) समक्रमांकाचा शासन निर्णय दिनांक २५ जानेवारी २०२४.

७) अभियान संचालक (जजीमि),राज्य पाणी व स्वच्छता मिशन,सिडको भवन,बेलापूर यांचे पत्र.क्र. रापास्वमि/पागुशा ०५२३/ प्र. क्र. १४/४१९/२०२३, दिनांक १३ फेब्रुवारी, २०२४.

८) आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र जा.क्र. भूसवियं/पा.गु./प्रयोग/Flamephotometer/प्रशामान्यता/९०/२०२४,दि.१५फेब्रुवारी, २०२४.

प्रस्तावना

राज्यामध्ये जल जीवन मिशन कार्यक्रम राबविण्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनामार्फत प्राप्त निधीपैकी २% निधी, पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण

घटकाखाली स्वतंत्रपणे तरतूद करणेबाबत, जल जीवन मिशन कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांमध्ये नमूद करण्यात आले आहे. संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील आदेशान्वये जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण घटकाखालील केंद्र/राज्य हिस्सा निधी, राज्य पाणी व स्वच्छता मिशन,सिडको भवन, बेलापूर कार्यालयास वितरित करण्यात आला आहे.

जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत ६ विभागीय आणि २८ जिल्हा प्रयोगशाळांमध्ये पाण्यातील Sodium व Potassium घटक तपासणीसाठी आवश्यक असलेले रू. ६८.००/- (रू. अडुसष्ट लक्ष फक्त) इतक्या रकमेचे Microprocessor based Flame Photometer उपकरण आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे मार्फत खरेदी करण्यासाठी उपरोक्त संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. आता, अभियान संचालक (जजीमि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर कार्यालयाच्या संदर्भाधीन क्रमांक ७ येथील आदेशास अनुसरून सदर उपकरण खरेदीकरिता एकूण मंजूर निधी रू.१०२.०० लक्ष ला सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव, आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे संदर्भाधीन क्रमांक ८ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. अभियान संचालक (जजीमि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर कार्यालयाच्या संदर्भाधीन क्र. ४ येथील आदेशांन्वये, सदर उपकरण खरेदीकरिता कार्यकारी समितीद्वारे एकूण मंजूर निधी रक्कम रू.१०२.०० लक्ष पैकी एकूण रू.६८.०० लक्ष एवढा निधी वितरीत केला होता. त्यास अनुसरून भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे कार्यालयाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील पत्रान्वये सादर रू. ६८.०० लक्ष एवढ्या निधीच्या प्रस्तावास संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, आता अभियान संचालक (जजीमि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर कार्यालयाच्या संदर्भाधीन क्र. ७ येथील आदेशान्वये, कार्यकारी समितीच्या मान्यतेनुसार या बाबीकरिता एकूण मंजूर निधी रू.१०२.०० लक्ष पैकी यापूर्वी वितरीत रू.६८.०० लक्ष निधी वगळता उर्वरित रू.३४.०० लक्ष एवढा निधी आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना वितरित करण्यात आला आहे. सबब, यापूर्वी संदर्भाधीन क्र. ६ येथील दिनांक २५ जानेवारी २०२४ अन्वये रू. ६८.०० लक्ष निधीस देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येऊन, राज्यातील ६ विभागीय आणि २८ जिल्हा प्रयोगशाळांमध्ये पाण्यातील Sodium व Potassium घटक तपासणीसाठी Microprocessor based Flame Photometer उपकरण खरेदी करण्यासाठी एकूण मंजूर निधी रू. १०२.०० लक्ष (रू. एकशे दोन लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, संदर्भाधीन क्र. ६ येथील दिनांक २५ जानेवारी २०२४ रोजीचा शासन निर्णय प्रशासकीय कारणास्तव अधिक्रमित करण्यात येत आहे. आता, ६ विभागीय आणि २८ जिल्हा प्रयोगशाळांमध्ये पाण्यातील Sodium व Potassium घटक

तपासणीसाठी आवश्यक असलेले एकूण ३४ Microprocessor based Flame Photometer उपकरण खरेदीकरिता एकूण मंजूर निधी रू.१०२.०० लक्ष (रूपये एकशे दोन लक्ष फक्त) आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे मार्फत खर्च करण्याच्या प्रस्तावास, जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण घटकाखालील केंद्र/राज्य हिस्सा निधीमधून, अभियान संचालक (जजीमि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर कार्यालयाच्या संदर्भाधीन क्रमांक ७ येथील आदेशामध्ये नमूद केल्याप्रमाणे, सदर आदेशामधील अटी व शर्तींची पुर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या करिता होणारा खर्च मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (३०) जल जीवन अभियान पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय्य ( केंद्र हिस्सा ६०% ) कार्यक्रम (२२१५ ९९८९) व (राज्य हिस्सा ४०%) कार्यक्रम (२२१५ ९९७१) या लेखाशिर्षाखालील ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६२८११०९०६२४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL NIWRUTTI DHAS

Digitally signed by ANIL NIWRUTTI DHAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F85F1C64C05886C8D514E40D54D27FF3A80FFD907A05433B1C412B7F7FFA0AFD, cn=ANIL NIWRUTTI DHAS
Date: 2024.06.29 14:40:17 +05'30'

**(अनिल धस)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.अध्यक्ष, विधानसभा/मा.सभापती विधान परिषद/मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद.
२. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) मंत्रालय, मुंबई, यांचे खाजगी सचिव.
३. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
४. महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
५. आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
६. अभियान संचालक (जजीमि),राज्य पाणी व स्वच्छता मिशन,सिडको भवन,बेलापूर

७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक.
८. उप सचिव (जजीमि), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक.
९. कार्यासन पापु-०४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-०१
१०.निवडनस्ती पापु-१२, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई-०१